**देंदोनवाडी ल. पा. प्रकल्प ता. कणकवली, जि. सिंधूदूर्ग या प्रकल्पाचे रु. ५६०३.७९ लक्ष किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र. लपायो -२०२१/(प्र. क्र.९०/२०१९)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०२ फेब्रुवारी, २०२२

**पहावे :-**

१) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. लपायो/१३९३/(४१८/९३)/ खारभूमी, मंत्रालय, मुंबई दि. २३/१२/१९९७.

२) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोपाविमं/तां-३/देंदोनवाडी सुप्रमा/१७९२/सन २०१९ दिनांक २८/०५/२०१९

३) वित्त विभागाचे पत्र क्र. व्यअस-२०२१/प्र.क्र.१७५/अर्थ-२ दि. ०६ जानेवारी, २०२२

**प्रस्तावना:-**

देंदोनवाडी ल.पा.प्रकल्प हा सिंधुदूर्ग जिल्ह्याच्या कणकवली तालुक्यातील उत्तमनगर गावाजवळ स्थानिक नाल्यावर बांधण्यात येत आहे. सदर प्रकल्प कोकण पाटबंधारे विकास महामंडळ अंतर्गत 'उर्वरीत महाराष्ट्र' या प्रदेशांतर्गत आहे. १०.१६२ दलघमी एकूण पाणीसाठ्याच्या या प्रकल्पाद्वारे कणकवली तालुक्यातील श्रीनगर, राजनगर, उल्हासनगर, लिंगेश्वरनगर, पिंपळेश्वरनगर, उपनगर, कळसुली व कुडाळ तालुक्यातील आंब्रड या ८ गावातील ५९५ हेक्टर क्षेत्रास बंदिस्त नलिकेव्दारे सिंचनाचा लाभ देणे नियोजित आहे.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.१ येथील दि. २३/१२/१९९७ च्या शासन निर्णयान्वये प्रादेशिक दरसूची सन १९९५-९६ नुसार रु. १२४४.३२ लक्ष रकमेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सन २०१७-१८ च्या दरसुचीवर आधारीत रु. ५६०३.७९ लक्ष किंमतीच्या व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत, राज्य तांत्रिक सल्लागार समिती -२ पुणे च्या दि. २२/०३/२०१९ रोजी झालेल्या २८ व्या बैठकीत छाननी अहवालातील १ ते २७ मुद्दे विचारात घेण्याच्या अधीन राहून, समितीकडुन शिफारस करण्यात आली आहे.

हा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि. १६ डिसेंबर २०२१ च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने सद्य:स्थिती, दरसूचीतील बदल, नवीन भूसंपादन कायदा, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादी किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन देंदोनवाडी लघु पाटंबधारे योजना, ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारीत रु. ५६०३.७९ लक्ष किंमतीस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमीत करीत आहे.

**शासन निर्णय :-**

देंदोनवाडी लघु पाटंबधारे योजना, ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु. ५६०३.७९ लक्ष ( अक्षरी रुपये छपन्न कोटी तीन लक्ष एकोणऐंशी हजार फक्त ) किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी

रु. ४९६०.९३ लक्ष व अनुषंगीक खर्च ६४२.८७ लक्ष) खालील अटींच्या अधीन राहून द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्षनिहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

२) "देंदोनवाडी लघु पाटंबधारे योजना, ता.कणकवली, जि. सिंधुदुर्ग" या प्रकल्पाची द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

३) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय कार्यालयांची राहील.

४) राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

५) द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

६) संपूर्ण प्रकल्प हा द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.२०६ /२०२१ , दिनांक ०३/१२/२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.४२८/२०२१, दिनांक १५/१२/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक १६/१२/२०२१ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २२० या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२०२१५०४०१६२२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अमोल फुंदे)
शासनाचे उपसचिव

सहपत्र :- परिशिष्ट "अ"

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, याचे सचिवमुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई
३. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.

९. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग / रत्नागिरी

१०. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे

११. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.

१२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई

१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१५. अधीक्षक अभियंता, दक्षिण कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस-सिंधुदर्गनगरी

१६. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

१७. खारभूमी कार्यासन/ कार्यासन लपा, (संग्रहार्थ) ....

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो -२०१९/(प्र. क्र.९०/२०१९)/खारभूमी, दिनांक:०२ फेब्रुवारी,२०२२ चे परिशिष्ट)

**देंदोनवाडी लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.कणवली, जि. सिंधुदुर्ग द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशिर्ष | द्वितीय सुप्रमा नुसार तरतुद (दरसूची सन २०१७-१८) रू. लक्ष |
|---|---|---|
| **अ) शिर्ष कामे** | | |
| १. | अे - प्राथमिक | २८.५२ |
| २. | बी - भूसंपादन | १५११.१५ |
| ३. | सी - मुख्य कामे | १८१६.७१ |
| ४. | डी - विमोचक | १७९.०६ |
| ५. | जी.पूल | ०.०० |
| ६. | के-इमारती | ७.९३ |
| ७. | एम-वृक्षारोपण | ३.३७ |
| ८. | ओ-संकीर्ण | ३.९८ |
| ९. | पी-देखभाल दुरुस्ती | २१.३० |
| १०. | आर-रस्ते | १३४.२८ |
| ११. | एक्स- पर्यावरण | ०.०० |
| | **एकूण शिर्षकामे (अ)** | **३७०६.३०** |
| **ब) कालवे व वितरण व्यवस्था** | | |
| १. | अे - प्राथमिक | १८.७५ |
| २. | बी - भूसंपादन | ५२.८९ |
| ३. | एल मातीकाम/PDN | ११६९.२७ |
| ४. | एम-वृक्षालागवड | ०.०० |
| ५. | ओ-संकीर्ण | २.०२ |
| ६. | पी-देखभाल | ११.६९ |
| | **एकूण (ब)** | **१२५४.६२** |
| **एकूण कामे (अ+ब)** | | **४९६०.९३** |
| **क) अनुषंगीक खर्च** | | **६४२.८७** |
| **एकूण (अ+ब+क)** | | **५६०३.७९** |

**ठळक वैशिष्टे :--**

| | | |
|---|---|---|
| १. | देंदोनवाडी योजनेचे सिंचन क्षेत्र | ५९५ हे. |
| २. | योजनेचा पाणीसाठा | १०.१६२ द.ल.घ.मी |
| ३. | लाभव्यय गुणोत्तर | २.३४ (मापदंड १ पेक्षा अधिक मापदंडात बसते) |
| ४. | आर्थिक परतावा दर | १४.३१ % ( मापदंड १२ % पेक्षा अधिक) योजना मापदंडात बसत आहे. |
| ५. | पाणीसाठा किंमत | रू. ५५,१४७/- प्रति संघमी प्रचलित मापदंड रू १,७६,७२० पेक्षा कमी) योजना मापदंडात बसते. |

(अमोल फुंदे)
शासनाचे उप सचिव